**श्री.आर.एन.दोंदे, सह दुय्यम निबंधक वर्ग-२,**
**हवेली क्र.२४ यांचे निलंबनाबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**क्रमांक: आस्थाप-२०२५/४६१/प्र.क्र.५०/म-१(धोरण)**
**दालन क्र.एम-७ ए, पोटमाळा,मादाम कामा रोड,**
**हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय(विस्तार),**
**मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : ६ मे, २०२५**

**वाचा:** नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.का.९/निलंबन/श्री.दोंदे/७१३/२०२५, दि.२० मार्च,२०२५.

**आदेश**

ज्याअर्थी, नोंदणी उप महानिरीक्षक व मुद्रांक उप नियंत्रक, पुणे विभाग, पुणे यांच्या समवेत सह जिल्हा निबंधक वर्ग-१ तथा मुद्रांक जिल्हाधिकारी, पुणे शहर यांनी सह दुय्यम निबंधक वर्ग-२, हवेली क्र.२४ या कार्यालयाला अचानक भेट देऊन सह जिल्हा निबंधक वर्ग-१ तथा मुद्रांक जिल्हाधिकारी, पुणे शहर यांच्या कार्यालयातील तपासणी पथकामार्फत सह दुय्यम निबंधक वर्ग-२, हवेली क्र.२४ या कार्यालयात कार्यरत असलेले सह दुय्यम निबंधक वर्ग-२ संवर्गातील श्री.आर.एन.दोंदे, यांनी दिनांक ०९.०८.२०२४ ते दिनांक ११.१०.२०२४ या कालावधीतील नोंदविलेल्या एकूण २२२८ दस्तांची स्वैरपध्दतीने तपासणी केली असता, श्री. दोंदे यांनी सदर दस्तांपैकी ९ दस्तांमध्ये मुद्रांक शुल्क रु. ३,१८,४१,६३०/- व नोंदणी फी रक्कम रु.१,१३,०००/- अशा एकूण रु.३,१९,५४,६३०/- इतक्या शुल्काची कमी आकारणी केली असल्याची बाब उक्त तपासणी पथकाला प्रथमदर्शनी निदर्शनास आली असल्याचे नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दि.२०.०३.२०२५ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे.

त्याअर्थी, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम-४ अन्वये शासकीय कर्मचाऱ्याला त्याच्याविरुध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्याचे योजिले असेल किंवा अशी कार्यवाही प्रलंबित असेल अशा बाबतीत निलंबनाधीन ठेवू शकेल.

त्याअर्थी, आता शासन, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम-४ च्या तरतुदीनुसार, शिस्तभंगविषयक कारवाई प्रस्तावित करुन त्यांना उक्त नियमाच्या नियम ४ च्या पोट-नियम (१) च्या खंड (अ) नुसार प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन याव्दारे, श्री. आर.एन.दोंदे, सह दुय्यम निबंधक वर्ग-२, हवेली क्र.२४ यांना दिनांक ६.५.२०२५ (म.नं.) पासून निलंबित करीत आहे आणि पुढील आदेश काढले जाईपर्यन्त ते निलंबित राहतील.

२. पुढे असेही आदेश देण्यात येत आहेत की, हा आदेश अंमलात राहील तोपर्यंत श्री. आर.एन.दोंदे, सह दुय्यम निबंधक वर्ग-२, हवेली क्र.२४ यांचे मुख्यालय सह जिल्हा निबंधक वर्ग-२, नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, नागपूर विभाग कार्यालय, नागपूर हे राहील. श्री. आर.एन.दोंदे, सह दुय्यम निबंधक वर्ग-२, हवेली क्र.२४ यांना सक्षम अधिका-यांच्या पूर्वपरवानगी शिवाय त्यांचे मुख्यालय सोडता येणार नाही.

३. पुढे असेही आदेश देण्यात येत आहेत की, हे आदेश अस्तित्वात राहतील त्या कालावधीसाठी श्री. आर.एन.दोंदे, सह दुय्यम निबंधक वर्ग-२, हवेली क्र.२४ यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम ६८ (१) (ए) अन्वये निर्वाहभत्ता व त्यावरील इतर भत्ते देय राहतील.

४. श्री. आर.एन.दोंदे, सह दुय्यम निबंधक वर्ग-२, हवेली क्र.२४ यांना निलंबन कालावधीत महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ च्या नियम-१६ मधील तरतूदीनुसार कोणतीही खाजगी नोकरी स्विकारता येणार नाही अथवा कोणताही व्यवसाय करता येणार नाही. जर, श्री. आर.एन.दोंदे, सह दुय्यम निबंधक वर्ग-२, हवेली क्र.२४ यांनी खाजगी नोकरी स्वीकारली अथवा काही व्यवसाय केला तर, गैरवर्तणूकीबाबत त्यांना दोषी समजण्यात येऊन, त्याप्रमाणे त्यांचेविरुध्द कारवाई करण्यास ते पात्र होतील आणि अशा परिस्थितीत ते निर्वाहभत्ता मिळण्याचा हक्क गमावतील.

५. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०५०६१७२९४४२११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=559498df564ab1121a356349085c1b8e3cc0f12569ba0f7f2090386d4dccb333, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2025.05.06 17:31:27 +05'30'

**(सत्यनारायण बजाज)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) श्री. आर.एन.दोंदे, सह दुय्यम निबंधक वर्ग-२, हवेली क्र.२४ व्दारा- नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांना विनंती करण्यात येते की, सदरील आदेश श्री. आर.एन.दोंदे यांना खास दुतामार्फत बजावून, त्यांची दिनांकित पोच पावती शासनास कृपया तात्काळ सादर करावी.
२) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महाराष्ट्र राज्य,पुणे.
३) नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, नागपूर विभाग कार्यालय, नागपूर.
४) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता),पुणे/मुंबई/नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर.
६) निवडनस्ती, कार्यासन म-१(धोरण),मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.